जिल्हा आरोग्य अधिकारी (गट-अ), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग या अस्थाई पदास मुदतवाढ.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१७/प्र.क्र.८६/आरोग्य-४**
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: २३ जून, २०१७.

वाचा

1) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः पीएचडी-१४१/२०३९/पीएच-१६, दि.४.०५.१९८१.**
2) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१६/प्र.क्र.४६/आरोग्य-४, दि.२०.१०.२०१६.**
3) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-१/वर्ग-१/टे-५/अस्थाई पदे/जिआअसं/न.क्र.१/१७९६/२०१७, दि.१७.०६.२०१७.**

**शासन निर्णय**

जिल्हा आरोग्य अधिकारी (गट-अ), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग हे अस्थाई पद संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आले असून या पदास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ या कालावधीपर्यत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदर मुदतवाढ संपुष्टात आली असल्याने व सदर पद कार्यालय प्रमुखाचे असून हे पद आरोग्य विषयक कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्याकरिता आवश्यक असल्याने या पदास दि.१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रस्तावावरील मागणी क्रमांक.आर-१ मुख्य लेखाशीर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा, ११०- रुग्णालये व दवाखाने, ११०-७ पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनाअंतर्गत योजना, (०६)(०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०३६२)” या लेखाशीर्षाखाली खर्च सन २०१७-१८ साठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२३११४४१३५३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.06.23 17:16:07 +05'30'

**रोशनी कदम-पाटील**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई

२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग
९. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).